# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

### शासन आदेश क्रमांकः कअनि - १११८/प्र.क्र.८६/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २६ सप्टेंबर, २०१८

## आदेश

श्रीमती स्नेहा र. बोरगे, कक्ष अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांच्या सेवा ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या अधिपत्याखालील महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत, राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई कार्यालयातील कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने एक वर्षांच्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून सुपूर्द करण्यात येत आहेत.

अ) श्रीमती बोरगे ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल त्यानंतर एक वर्षांनी प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करुन त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्याला परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी राखून ठेवील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठवण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र याप्रमाणे परत पाठवण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) श्रीमती बोरगे, कक्ष अधिकारी यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची लेखी नोटीस शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. म.ना.से.(पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा ..इ) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट - दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन ग्रामविकास व जलसंधारण विभाग (योजना-३) तसेच अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांनी श्रीमती बोरगे यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती, आपापसात सल्लामसलत करून ठरवाव्यात.

३. श्रीमती बोरगे यांच्या प्रतिनियुक्तीशी संबंधित सर्व प्रशासकीय बाबी ग्रामविकास व जलसंधारण विभाग (योजना-३) तसेच अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

४. श्रीमती बोरगे यांना प्रतिनियुक्तीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाने कार्यमुक्त करावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०९२६१७३६१०१६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan
Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.09.26 17:42:27 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति**

श्रीमती स्नेहा र. बोरगे , कक्ष अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
३) सह/ उप सचिव (आस्थापना), अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

त्यांना विनंती करण्यात येते की, प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्ती नमूद केलेल्या आदेशाची एक प्रत या कार्यासनाकडे पाठविण्यात यावी.

४) सह/उप सचिव (योजना ३), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य मिशन व्यवस्थापन कक्ष क्र. १०१ व १०२, मोनार्क प्लाझा, प्लॉट नं.५६, सेक्टर-११, बेलापूर, नवी मुंबई .
६) निवड नस्ती / संग्रहार्थ.